महाराष्ट्र गौण व्यापार नियमन योजनेत्तर योजनेमधील ४६१ अस्थायी पदांना सन २०२४-२५ मध्ये पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२४/प्र.क्र.२२/१/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ०७ मार्च, २०२४

वाचा :-

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.२१.०९.२०२१
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०८.०२.२०२३
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.२५/फ-९, दि.१०.०३.२०२३
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ३१.०८.२०२३
६. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.२५/फ-९, दि.२५.०९.२०२३
७. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४
८. उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३ /योजनेत्तर/प्र.क्र.०८ (२३-२४)/२७६, दिनांक २७.०२.२०२४

**शासन निर्णय :-**

उप वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वाचा येथील क्र.८ अन्वये महाराष्ट्र गौण व्यापार नियमन योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या ४६१ अस्थायी पदांना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये पुढे चालु ठेवण्यास मंजूरी प्रदान करण्याबाबत विनंती केलेली आहे.वाचा येथील क्र.२ च्या सुधारीत आकृतीबंधाचे पुर्नगठनप्रमाणे वन विभागाच्या एकूण २६५७३ पदांमध्ये या योजनेतील ४६१ पदांचा समावेश आहे.

यापूर्वी वित्त विभागाच्या वाचा येथील क्र.३ व ५ येथील नमूद शासन निर्णयास अनुसरुन महसूल व वन विभागच्या वाचा येथील क्र.४ व ६ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र गौण व्यापार नियमन योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या ४६१ अस्थायी पदांना सन २०२३-२४ मध्ये दिनांक ०१.०३.२०२३ ते २९.०२.२०२४ पर्यंत चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आली आहे.

वित्त विभागाच्या वाचा येथील क्र.७ च्या दिनांक २१.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृत्तीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२४ ते ३१.०८.२०२४ पर्यंत अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

त्यानुसार महाराष्ट्र गौण व्यापार नियमन योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या ४६१ अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२४ ते ३१.०८.२०२४ पर्यंत चालू ठेवण्यास सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर मुदतवाढ वाचा येथील क्र.१ व २ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृत्तीबंधात या पदांचा समावेश आहे या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

सदर पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर), ०१ वनीकरण, १०५ वनोत्पादने, (०१) शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन, (०१) (०१) शासकीय अभिकरणाकडून समुपयोजन (तेंदू) (२४०६ ०४५२), (०१) वेतन या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा व मान्य होणाऱ्या अर्थसंकल्पीय तरतुदींच्या मर्यादेतच उपरोक्त पदांसाठी खर्च करावा. सदर कालावधीमध्ये त्यांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेवून सुधारीत आकृत्तीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. यानंतर सुधारीत आकृत्तीबंध निश्चित करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही.

प्रस्तूत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक- पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०७१८०४३७७७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=Personal, title=4179,
pseudonym=133142602957487084g5f8e27R5OJA8P,
2.5.4.20=d2eb76cc3763a845a8edf9b9dde07f42d90c6bc17db755d4af91632f6c0b678e, postalCode=414001, st=MAHARASHTRA,
serialNumber=3b1afe499c80878329fbb017e4922f7356cc5edc76102e8ff88c7b9a67a322d9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2024.03.07 18:13:58 +05'30'

**( विवेक होशिंग )**
**उप सचिव (वने), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म. रा., नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अकाष्ट वनोपज, संनियंत्रण व मुल्यांकन), म. रा., नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व नागपूर.
६. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. मुख्य वनसंरक्षक नागपूर, गडचिरोली, चंद्रपूर, यवतमाळ, अमरावती, औरंगाबाद, धुळे, नाशिक वनवृत्त.
८. महालेखापाल १ / २ (लेखा परीक्षा ) / (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९. वित्त विभाग/ व्यय-१०, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
१०. फ-९ कार्यासन, महसूल व वन विभाग ( निवड नस्ती)

**शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण-२०२४/प्र.क्र.२२/१/फ-९, दिनांक ०७ मार्च, २०२४**
**सोबतचे विवरणपत्र**
**(दिनांक ०१.०३.२०२४ ते दिनांक ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली पदे)**

| अ.क्र. | पदनाम | एकूण |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अकाष्ट वनोपज, सनियंत्रण व मुल्यांकन) | १ |
| २ | कार्यालय अधिक्षक | ८ |
| २ | लेखापाल | १ |
| ३ | वनपाल | २२ |
| ४ | वनरक्षक | ३५९ |
| ५ | लिपीक | ६० |
| ६ | शिपाई | १० |
| | **एकूण:-** | **४६१** |

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=Personal, title=4179, pseudonym=133142602957487084g5f8e27R5OJA8P, 2.5.4.20=d2eb76cc3763a845a8edf9b9dde07f42d90c6bc17db755d4af91632f6c0b678e, postalCode=414001, st=MAHARASHTRA, serialNumber=3b1afe499c80878329fbb017e4922f7356cc5edc76102e8ff88c7b9a67a322d9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2024.03.07 18:14:17 +05'30'

( विवेक होशिंग )
उप सचिव (वने), महाराष्ट्र शासन

**********